UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) या प्रकल्पाअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२४/प्र.क्र.२०७/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४.
२. अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दिनांक ११.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

UNDP-Green Climate Fund यांच्या आंशिक अर्थ सहाय्यातून "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" या प्रकल्पास सह-आर्थिक बांधिलकीने राज्यात राबविण्याच्या प्रस्तावास दिनांक **१०.०६.२०२१** रोजी मा.मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार शासन निर्णय दिनांक **१.०७.२०२१** अन्वये प्रकल्पाची रुपरेषा स्पष्ट करण्यात आली आहे.

१. UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) या लेखाशिर्षात सन २०२४-२५ करिता एकूण रु. ८२४.०० लक्ष (०२- मजूरी- रु. ३००.०० लक्ष, २१- साहित्य व पुरवठा- रु. २००.०० लक्ष व ५०-इतर खर्च रु. ३२४.०० लक्ष) निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

३. प्रस्तुत योजनेअंतर्गत सन २०२४-२५ या चालू वर्षात कांदळवनांचे पुन:स्थापन, कांदळवन रोपवन, व नर्सरी कामाकरिता आवश्यक एकूण रु.१२५.३५ लक्ष (०२- मजूरी- रु. १२१.०२ लक्ष, २१-साहित्य व पुरवठा- रु. ४.३३ लक्ष) निधी वितरीत करण्याचे प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

४. वित्त विभागाच्या दिनांक १.०४.२०२४ व दिनांक २५.०७.२०२४ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२४-२५ करिता विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा निधी बीम्स प्रणालीवर वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

४. हे पहाता, वित्त विभागाचे उक्त परिपत्रक व BDS प्रणालीवरील उपलब्ध निधीच्या मर्यादेत सद्य:स्थितीत प्राप्त प्रस्तावान्वये मागणी केलेला रु.१२५.३५ लक्ष (०२- मजूरी- रु. १२१.०२ लक्ष, २१- साहित्य व पुरवठा- रु. ४.३३ लक्ष) निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन **२०२४-२५** करिता **UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities"** (२४०६ B२७२) अंतर्गत मागणी केलेल्या निधीपैकी उपलेखाशिर्षांतर्गत उपलब्ध

निधीच्या मर्यादेत एकूण रु. १२५.३५ लक्ष (०२- मजूरी - रु. १२१.०२ लक्ष + २१- **साहित्य व पुरवठा** -रु. ४.३३ लक्ष) निधी पुढील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.
२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.
३) वित्त विभागाने दिनांक **११/७/२००१** च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.
**४)** सदर मान्यता ही सन **२०२४-२५** या कालावधी करिताच देण्यात येत आहे.
**५)** सदर कामे करताना वन (संवर्धन एवं संरक्षण) अधिनियम, **१९८०** चा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.
६) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.
७) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-**७, २४०६** वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन **२०२४-२५** मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच वित्त विभागाच्या दिनांक **२५.०७.२०२४** च्या परिपत्रकातील अटी व सूचनांचे पालन करण्यात यावे.

**३.** सदर शासन निर्णय शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम /भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये व वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक २५.०७.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२८१८००११४११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2024.08.28 18:15:49 +05'30'

**( अपर्णा उपासनी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.